राष्ट्रीय कृषि विस्तार व तंत्रज्ञान अभियानाच्या (NMAET) कृषि विस्तार उप अभियानातंर्गत, राज्याच्या कृषि विस्तार कार्यक्रमांमध्ये सुधारणांकरिता सहाय्य (आत्मा) योजनेंतर्गत अनुसूचित जाती प्रवर्गासाठीचा सन २०२३-२४ करिता पाचव्या हप्त्याच्या केंद्र हिश्यापैकी उर्वरीत रू. २०.०३३७० लक्ष व समरूप राज्य हिश्यापैकी उर्वरीत रू. १३.३६२४४ लक्ष असा एकूण रु. ३३.३९६१४ लक्ष इतका निधी चालू वर्षी वितरीत करण्यास मान्यता देणेबाबत..

# महाराष्ट्र शासन

## कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग

**शासन निर्णय क्रमांकः आजाती-२०२३/प्र.क्र.१२०/३-अे,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०००३२
दिनांक : ३१ मार्च, २०२४

**वाचा -**

१. केंद्रीय कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय यांचे पत्र क्र. एफ.नं.३६-२८/२०१७-अेई/विस्तार कक्ष, दि.१५.०६.२०२३
२. संचालक (आत्मा), यांचे पत्र क्र. कृआ./आत्मा/वाकृआ/प्रशा. मं./३५४/२०२३, दि.१६.०६.२०२३
३. संचालक (आत्मा), यांचे पत्र क्र. आत्मा/प्र.क्र. १५/लेखा/पुराही/ /३५३/२३, दि. १६.०६.२०२३
५. कृषि व पदुम विभाग शा. नि. क्र. संकीर्ण-२०२३/प्र.क्र.११९/३-अे, दि.२०/०६/२०२३
६.सा.न्या.व वि.स.विभाग शा.नि.क्र.बीजीटी-२०२३/प्र.क्र.६१/अर्थसंकल्प(विघयो), दि.२०.०७.२०२३
७. कृषि व पदुम विभाग शा. नि. क्र. आजाती-२०२३/प्र.क्र.१२०/३-अे, दि.२०.०७.२०२३
८. केंद्रीय कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय यांचे पत्र क्र. एफ.नं.३६-२८/२०१७-अेई/विस्तार कक्ष, दि.२८.०८.२०२३
९. संचालक (आत्मा), यांचे पत्र क्र. आत्मा/प्र.क्र. १५/लेखा/पुराही/ /५२८/२३, दि. २९.०८.२०२३
१०. सा.न्या.व वि.स.विभाग शा.नि.क्र.बीजीटी-२०२३/प्र.क्र.६१/अर्थसंकल्प(विघयो), दि.१३.१०.२०२३
११. कृषि व पदुम विभाग शा. नि. क्र. आजाती-२०२३/प्र.क्र.१२०/३-अे, दि.१६/१०/२०२३
१२. केंद्रीय कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय यांचे पत्र क्र. एफ.नं.३६-२८/२०१७-अेई/विस्तार कक्ष, दि.१६.११.२०२३
१३. संचालक (आत्मा), यांचे पत्र क्र. आत्मा/प्र.क्र. १५/लेखा/पुराही/७५८/२३, दि. २०.११.२०२३
१४. सा.न्या.व वि.स.विभाग शा.नि.क्र.बीजीटी-२०२३/प्र.क्र.६१/अर्थसंकल्प(विघयो), दि.१५.१२.२०२३
१५. कृषि व पदुम विभाग शा. नि. क्र. आजाती-२०२३/प्र.क्र.१२०/३-अे, दि.१८.१२.२०२३
१६. केंद्रीय कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय यांचे पत्र क्र. एफ.नं.३६-२८/२०१७-अेई/विस्तार कक्ष, दि.०८.०२.२०२४
१७. संचालक (आत्मा), यांचे पत्र क्र. आत्मा/प्र.क्र.८७/लेखा/पुराही/९२/२४, दि. ०९.०२.२०२४
१८. सा.न्या.व वि.स.विभाग शा.नि.क्र.बीजीटी-२०२३/प्र.क्र.६१/अर्थसंकल्प(विघयो), दि.२६.०२.२०२४
१९. कृषि व पदुम विभाग शा. नि. क्र. आजाती-२०२३/प्र.क्र.१२०/३-अे, दि.२७.०२.२०२४

२०. केंद्रीय कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय यांचे पत्र क्र. एफ.नं.९-२ /२०२३-अेई/विस्तार कक्ष, दि.२२.०३.२०२४
२१. संचालक (आत्मा), यांचे पत्र क्र. आत्मा/प्र.क्र.०१/लेखा/पुराही/९६९२/२४, दि. २३.०३.२०२४
२२. कृषि व पदुम विभाग शा. नि. क्र. आजाती-२०२३/प्र.क्र.१२०/३-अे, दि.२८.०३.२०२४
२३. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग ज्ञापन क्र. बीजीटी-२०२३/प्र.क्र.६१/अर्थसंकल्प, दि.३१.०३.२०२४

**प्रस्तावना -**

केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय कृषि विस्तार व तंत्रज्ञान अभियानांतर्गत ( NMAET) कृषि विस्तार उप अभियान राबविण्यात येत आहे. सदर उप अभियानात राज्याच्या कृषि विस्तार कार्यक्रमांमध्ये सुधारणांकरिता सहाय्य (आत्मा) ही योजना केंद्र व राज्य शासनाच्या ६०:४० अर्थसहाय्याच्या प्रमाणात राबविण्यात येते. सदर योजना सन २०२३-२४ मध्ये राबविण्यासाठी केंद्र शासनाच्या संदर्भाधीन दि. १५.०६.२०२३ पत्रान्वये दिलेल्या सुचनांस अनुसरुन सदर योजनेचा एकूण रु. ६०१४.५८ लक्ष रकमेचा राज्य कृति विस्तार आराखडा (SEWP) कृषि आयुक्तालयाने उपरोक्त संदर्भाधीन दि. १६.०६.२०२३ रोजीच्या पत्रान्वये शासनास मान्यतेस्तव सादर केला होता. आत्मा योजनेच्या सदर रु. ६०१४.५८ लक्ष रकमेच्या आराखड्यास राज्य प्रकल्प मंजूरी समितीने (SLSC) दि.१७.०५.२०२३ रोजी झालेल्या बैठकीत मान्यता दिली असुन त्यानुसार सदर आराखड्यास विभागाकडून दि. २०.०६.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे.

आत्मा अंतर्गत सन २०२३-२४ या अर्थिक वर्षात अनुसुचित जाती प्रवर्गाकरिता अर्थसंकल्पित लेखाशीर्ष २४०१ B३०१ अंतर्गत केंद्र हिस्स्याकरिता रु. ३१२.०० लक्ष व लेखाशीर्ष २४०१ B३१२ अंतर्गत राज्य हिस्स्याकरिता रु.२०८.०० लक्ष इतकी तरतूद करण्यात आली आहे. दि. २०.०७.२०२३, दि.१६.१०.२०२३, दि. १८.१२.२०२३, दि. २७.०२.२०२४ व दि.२८.०३.२०२४ रोजीच्या शासन निर्णयांन्वये आत्मा योजनेंतर्गत सन २०२३-२४ करिता पहिल्या, दुसऱ्या, तिसऱ्या, चौथ्या व पाचव्या हप्त्याचा अनुसुचित जाती प्रवर्गासाठी केंद्र हिस्सा रु. ३११.९९ लक्ष व राज्य हिस्सा रु. २०७.९९ लक्ष असा एकूण रु. ५१९.९८ लक्ष इतका निधी आयुक्त (कृषि) यांना वितरीत करण्यात आला आहे.

केंद्र शासनाने सन २०२३-२४ करिता आत्मा योजनेकरिता संदर्भाधीन दि.२२.०३.२०२४ रोजीच्या पत्रान्वये केंद्र हिश्याचा अनुसुचित जाती प्रवर्गासाठी रु. ३४.०० लक्ष निधी वितरीत केला आहे, त्यानुषंगाने संचालक (आत्मा) यांनी दि.२३.०३.२०२४ रोजीच्या पत्रान्वये सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरिता आत्मा अंतर्गत अनुसुचित जाती प्रवर्गासाठी पाचव्या हप्त्याचा केंद्र हिस्सा रु. ३४.०० लक्ष व पूरक राज्य हिस्सा २२.६७ लक्ष निधी वितरीत करणेबाबत विनंती केली होती. मात्र केंद्र हिश्यापैकी रू.१३.९६६३० लक्ष व पूरक राज्य हिश्यापैकी रू. ९.३०७५६ लक्ष इतका निधी शिल्लक असल्याने सदर निधी दि.२८.०३.२०२४ च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला आहे. उर्वरीत केंद्र हिस्सा रू. २०.०३३७० लक्ष व उर्वरीत राज्य हिस्सा रू. १३.३६२४४ लक्ष इतका निधी पुनर्विनियोजनाद्वारे उपलब्ध करुन देण्याची विनंती नियोजन व वित्त विभागास करण्यात

आली होती, त्यानुसार वित्त विभागाने सदर योजनेसाठी उर्वरीत केंद्र हिस्सा रू. २०.०३३७० लक्ष व उर्वरीत राज्य हिस्सा रू. १३.३६२४४ लक्ष असा एकूण रू. ३३.३९६१४ लक्ष निधी वितरणासाठी उपलब्ध करुन दिला आहे. सदर निधी संदर्भ क्र.२३ येथील ज्ञापनान्वये पुनर्विनियोजनाने उपलब्ध झाला असून तो वितरीत करण्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे -

**शासन निर्णय :**

१. सन २०२३-२४ करिता केंद्र पुरस्कृत राज्य कृषि विस्तार कार्यक्रमांना विस्तार विषयक सुधारणा करण्यासाठी सहाय्य उप अभियान या योजनेच्या अंमलबजावणीसाठी चालू वर्षाकरिता अनुसूचित जाती प्रवर्गासाठी पाचव्या हप्त्याच्या केंद्र हिश्यापैकी उर्वरीत रू. २०.०३३७० लक्ष (अक्षरी रूपये वीस लक्ष तीन हजार तीनशे सत्तर फक्त) व समरूप राज्य हिश्यापैकी उर्वरीत रू. १३.३६२४४ लक्ष (अक्षरी रूपये तेरा लक्ष छत्तीस हजार दोनशे चव्वेचाळीस फक्त) असा एकूण रु. ३३.३९६१४ लक्ष (अक्षरी रूपये तेहेतीस लक्ष एकोणचाळीस हजार सहाशे चौदा फक्त) इतका निधी आयुक्त (कृषि) यांना बीडीएस प्रणालीवर वितरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर योजनेकरीता प्रत्यक्ष वितरीत करण्यात येणा-या निधीच्या मर्यादेत योजनेची अंमलबजावणी करावी. सदर योजनेच्या अंमलबजावणीसाठी चालू वर्षाकरिता अनुसूचित जाती प्रवर्गाकरिताच्या केंद्र हिश्यापैकी उर्वरीत रू. २०.०३३७० लक्ष (अक्षरी रूपये वीस लक्ष तीन हजार तीनशे सत्तर फक्त) निधी पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

(अ)मागणी क्रमांक एन-३, २४०१ पीक संवर्धन,००, ७८९-अनुसूचित जातीसाठी विशेष घटक योजना,(०१) अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना (०१)(२३), कृषि उन्नती योजना - कृषि विस्तार अभियान- विस्तार विषयक कामांत सुधारणा करण्याकरिता राज्याच्या विस्तार कार्यक्रमांना सहाय्य (केंद्र पुरस्कृत योजना) (केंद्र हिस्सा ६०%) ( अनुसूचित जाती) (२४०१ बी३०१), ३३ अर्थसहाय्य

३. तसेच केंद्र हिश्श्यास समरूप राज्य हिश्यापैकी उर्वरीत रू. १३.३६२४४ लक्ष (अक्षरी रूपये तेरा लक्ष छत्तीस हजार दोनशे चव्वेचाळीस फक्त) निधी पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

(ब) मागणी क्रमांक एन -३, २४०१ पीक संवर्धन,००, ७८९ - अनुसूचित जातीसाठी विशेष घटक योजना ,(०१) अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना (०१)(२४), कृषि उन्नती योजना- कृषि विस्तार अभियान- विस्तार विषयक कामांत सुधारणा करण्याकरिता राज्याच्या विस्तार कार्यक्रमांना सहाय्य (केंद्र पुरस्कृत योजना) (राज्य हिस्सा ४०%) (अनुसूचित जाती) (२४०१ बी३१२), ३३ अर्थसहाय्य

४. सन २०२३-२४ मध्ये राज्यात सदर योजनेची अंमलबजावणी व सनियंत्रण करण्याच्या दृष्टिने, पुढील अधिकाऱ्यांना नियंत्रण तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

| अ.क्र. | स्तर | नियंत्रण अधिकारी | आहरण व संवितरण अधिकारी |
|---|---|---|---|
| १. | आयुक्तालय स्तर | आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे | सहाय्यक संचालक (लेखा-१) कृषी, आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे. |
| २. | जिल्हास्तर | संबंधित प्रकल्प संचालक आत्मा | संबंधित जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी कार्यालयातील लेखाधिकारी. |

५. आत्मा कार्यक्रमांतर्गत सन २०२३-२४ साठी अनुसूचित जाती या प्रवर्गासाठी वितरीत करण्यात आलेला निधीचा केवळ त्याच प्रवर्गासाठी वापर करण्यात यावा.

६. सदर योजनेंतर्गत सन २०२३-२४ मध्ये वितरीत केलेल्या निधीचे लेखापरिक्षीत केलेली उपयोगिता प्रमाणपत्रे ( Audited Utilizaton Certificates ) सत्वर सादर करावीत.

७. सदर शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या अनौ.संदर्भ /अर्थसंकल्प शाखा, दि. २८.०३.२०२४ व वित्त विभागाच्या अनौ.सं.क्र.४३९/२०२४/व्यय-१४, दि.३१.०३.२०२४ अन्वये मिळालेल्या मान्यतेने तसेच वित्त विभागाचे परिपत्रक दि.१२.०४.२०२३, दि.०८.१२.२०२३ व ०४.०३.२०२४ मधील तरतूदींस अनुसरून व प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमीत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३३११८३३०५५१०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Digitally signed by NITIN BALKRISHNA SHELKE
Date: 2024.03.31 20:24:28 +05'30'

**( नितीन शेळके )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रती -**

१.प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२.सचिव (सामाजिक न्याय व विशेष सहाय्य ),सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
३.आयुक्त (कृषि) तथा राज्य नोडल अधिकारी आत्मा, कृषि आयुक्तालय,पुणे
४.आयुक्त (समाजकल्याण), पुणे
५.संचालक ( आत्मा ), कृषि आयुक्तालय,पुणे

६.सर्व जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष आत्मा नियामक मंडळ ( मुंबई शहर व मुंबई उपनगर वगळून )
७.सर्व संचालक, कृषि आयुक्तालय, पुणे
८.सर्व विभागीय कृषि सहसंचालक
९.सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा उपाध्यक्ष आत्मा नियामक मंडळ
१०.संचालक वनामती, नागपूर
११.उप संचालक, आत्मा, सामेती, पुणे
१२.सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे
१३.सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी,
१४.सर्व प्रकल्प संचालक (आत्मा),
१५.महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
१६.कृषि विकास अधिकारी, सर्व जिल्हा परिषद
१७.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१८.महालेखापाल - १/२(लेखा परिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता) मुंबई /नागपूर
१९.वित्त विभाग (का.व्यय-१) (अर्थसंकल्प-१२)(अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई.३२
२०.नियोजन विभाग, कार्यासन - १४१४, १४३१, मंत्रालय, मुंबई.३२
२१.कार्यासन अधिकारी, २-अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
२२.निवड नस्ती (कार्यासन-३अे)